**प्रशासकीय मान्यता :-**
**पोलीस दलाच्या आधुनिकीकरणाची चालू सन २००२-२००३ ची योजना-पहिल्या टप्प्यात पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्याकरिता केंद्र शासनाने मंजूर केलेल्या रु.५२४६.८२८ लक्ष रकमेच्या कार्यक्रमास (योजनेतर)**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांकःपीएलफ-०७०२/प्र.क्र.६८/पोल-४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक : १४ जानेवारी, २००३.

**वाचा :-** (१) गृह विभागाचे केंद्र शासनाला पाठविण्यात आलेले अर्ध शासकीय पत्र क्र.एफएसएल-०६०२/४१३/पोल-७, दि.५.८.२००२

(२) केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाचे पत्र क्र.VI-२१०११/२८/२००२/PM-I, दि.१.११.२००२

**शासन निर्णय :-** केंद्र शासनाने त्यांच्या दिनांक १८.९.२००० च्या पत्रान्वये सन २०००-२००१ या वित्तीय वर्षापासून पोलीस दलाच्या आधुनिकीकरणासाठी राज्य शासनाला प्रतिवर्षी रु.९२.१० कोटी इतका निधी पुढील ५ वर्षात सन (२०००-२००१ ते २००४-०५ पर्यंत) देण्याचे मान्य केलेले आहे. सदर निधी मंजूर करताना राज्य शासनाने सुध्दा तितकाच म्हणजे रु.९२.१० कोटीचा निधी, पुरक निधी (मॅचिंग ग्रँट) म्हणून उपलब्ध करुन देण्याची अट केंद्र शासनाने घातलेली आहे. अशा प्रकारे प्रतिवर्षी एकूण रु.१८४.२० कोटी प्रमाणे ५ वर्षात एकूण रु.९२१ कोटी इतका निधी पोलीस दलाच्या आधुनिकीकरणासाठी उपलब्ध होणार आहे.

२. केंद्र शासनाच्या निदेशाप्रमाणे सन २०००-२००१ ते २००४-०५ या कालावधीची पंचवार्षिक योजना तयार करुन शासनाच्या व शक्तीप्रदान समितीच्या मान्यतेनंतर ती दिनांक १.१०.२००१ रोजीच्या पत्रान्वये केंद्र शासनाला पाठविण्यात आलेली आहे. केंद्र शासनाने सन २०००-२००१ करीता रु.१६६.२० कोटी तर सन २००१-२००२ करीता रु.१९४.१० कोटी इतक्या रकमेच्या योजनांना मान्यता दिलेली आहे.

३. आता केंद्र शासनाने त्यांच्या क्र.VI-२१०११/२८/२००२-PM-I, दिनांक १.११.२००२ च्या पत्रान्वये चालू सन २००२-२००३ करीता सादर करण्यात आलेल्या रु.२००.०६३३ कोटी रकमेच्या योजनेपैकी पहिल्या टप्प्यात रु.१५१७३.१२८ लक्ष रकमेच्या कार्यक्रमास मान्यता दिलेली असून त्याबाबतचा शीर्ष व विभागनिहाय तपशिल

खालील तक्त्यात देण्यात आलेला आहे. तसेच पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी हाती घ्यावयाच्या कार्यक्रमाचा बाब-निहाय सविस्तर तपशील सोबतच्या परिशिष्ट "A" मध्ये देण्यात आलेला आहे.

(रूपये लाखात)

| अ.क्र. | शीर्ष | पो.म.सं.यांना मंजूर झालेली रक्कम | पो.आ.मुंबई यांना मंजूर झालेली रक्कम | एकूण मंजूर रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मोबीलीटी | १९६४.१६/- | ७६४.२०८/- | २७२८.३६८/- |
| २ | कम्युनिकेशन | ८१७.००/- | १३४.८५/- | ९५१.८५/- |
| ३ | कॉम्पुटरायझेशेन | ६८६.००/- | ५००.३०/- | ११८६.३/- |
| ४ | वेपनरी | ४५.६०/- | २७७.४२ | ३२३.०२०/- |
| ५ | इक्वीपमेंट | ६९४.३०/- | २४०.०५/- | ९३४.३५/- |
| ६ | बिल्डींग | २९१६.९९/- | १०८०.००/- | ३९९६.९९/- |
| ७ | पोलीस हौसिंग | २८०२.२५/- | २२५०.००/- | ५०५२.२५/- |
| | एकूण | ९,९२६.३ | ५२४६.८२८/- | १५१७३.१२८/- |

४. केंद्र शासनाने वरीलप्रमाणे पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांना मंजूर केलेल्या रु.५२४६.८२८ लक्ष रकमेच्या कार्यक्रमाला गृह विभाग, शासन निर्णय क्र.पीएलएफ-०१२०००/सीआर-१५/पोल-४, दिनांक २९.५.२००० मधील तरतुदीच्या तसेच खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे. (पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी हाती घ्यावयाच्या कार्यक्रमाला प्रशासकीय मंजूरी दिल्याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे काढण्यात आलेले आहेत.)

अटी :-

(अ) "मोबिलीटी" या शिर्षाखालील कार्यक्रम मंजूर करतांना मूळ प्रस्तावातील निधीच्या मागणीच्या (रू.१२७३.६८ लक्ष) ६०% इतक्या निधीची मागणी (रू.७६४.२०८ लक्ष) केंद्र शासनाने मान्य केलेली असून "लाईट व्हेईकल" या प्रकारात "जीप व जीप्सी" या प्रकारातील वाहन खरेदीला मंजूरी दिलेली आहे. त्याअनुषंगाने सोबत जोडलेल्या परिशिष्टातील मोबिलीटी या शिर्षाखालील मंजूर रू.७६४.२०८ लक्ष निधीतून लाईट व्हेईकल या प्रकारातील वाहने खरेदी करतांना जीप व जीप्सी या प्रकारातील वाहनांची खरेदी करण्यात यावी.

(ब) प्रस्तुत मंजूर कार्यक्रमांतर्गत देखभालीवरील खर्च, आवर्ती स्वरुपाचा खर्च, अथवा उपभोग्य सामग्रीवरील खर्च अनुज्ञेय नाही.

(क) "बिल्डींग" या शिर्षाखालील खर्च रु.६२५/- प्रती चौ.फु. (कंपांऊंड वॉल्ससह) आणि रु.५००/- प्रती चौ.फु. (कंपांऊड वाल्सशिवाय) या वित्तीय मर्यादेच्या अधिन राहून करण्यात यावा.

(ड) "पोलीस हौसिंग" या शिर्षाखालील खर्च ५०० चौ.फु.क्षेत्रफळाच्या लोअर सबॉर्डीनेट क्वॉर्टरस करिता रु.२.५० लक्ष आणि ९५० चौ.फु.क्षेत्रफळाच्या अप्पर सबॉर्डीनेट क्वॉर्टरसकरिता रु.४.७५ लक्ष या दर व वित्तीय मर्यादेच्या अधिन राहून करण्यात यावा.

(इ) ३५०० चौ.फु.क्षेत्रफळाच्या पोलीस ठाण्याच्या बांधकामावरील खर्च रु.६२५/- प्रती चौ.फु. या दराने रु.२१.८७ लक्ष (पाच एकर क्षेत्रफळाच्या भूभागाभोवतीच्या कंम्पांऊड वाल्ससह) इतक्या वित्तीय मर्यादेच्या अधीन राहून करण्यात यावा.

५. उपरोक्त तक्त्यामध्ये जो कार्यक्रम दर्शविण्यात आलेला आहे, त्यावरील खर्च अंदाजीत असून शासनाच्या प्रचलित नियमानुसार प्रत्येक बाब निहाय खर्च हा विहित पध्दतीने व शिर्षनिहाय विहित करण्यात आलेल्या वित्तीय मर्यादेच्या अधिन राहून करण्यात यावा.

६. गृह विभाग शासन निर्णय क्रमांक:पीएलएफ-०४०२/प्र.क्र.४६/पोल-४, दिनांक १५.७.२००२ अन्वये पोलीस विभागात संगणकीकरणासंबधी प्रकल्प राबविण्यासाठी "प्रकल्प अंमलबजावणी समिती "स्थापन करण्यात आलेली असल्याने संगणकीकरणाबाबतच्या योजनांना "प्रकल्प अंमलबजावणी समितीची" वेळोवेळी मान्यता घेण्यात यावी व तद्नंतर संगणकीकरणाचा कार्यक्रम राबविण्यात यावा.

७. पोलीस दलाच्या आधुनिकीकरणाच्या योजनेअंतर्गत प्रशासकीय मान्यता मिळालेली साधनसामुग्री खरेदी करतांना खरेदीसाठी शासनाने (उद्योग ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्र.भांखर्स-१०८८/ २५१२/उद्योग-६, दिनांक २.१.१९९२ अन्वये) विहीत केलेल्या कार्यपध्दतीचा काटेकोरपणे अवलंब करण्यात यावा.

८. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांना या कार्यक्रमांतर्गत "बिल्डींग व पोलीस हौसिंग" या शिर्षाखाली मंजूर करण्यात आलेला निधी महाराष्ट्र राज्य पोलीस गृह निर्माण व कल्याण महामंडळाला "सहाय्यक अनुदान" (GRANT-IN-AID) म्हणून उपलब्ध करुन देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. जे प्रकल्प/जी बांधकामे सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत राबविणे/हाती घेणे आवश्यक आहे. त्या प्रकल्पांकरीताचा/ /बांधकामाकरीताचा निधी पोलीस गृहनिर्माण महामंडळाने पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या सल्ल्याने सार्वजनिक

बांधकाम विभागाच्या संबंधित अधिक्षक अभियंत्यांकडे सुपुर्द करावा. संबंधित बांधकाम ज्या पोलीस घटक कार्यालयाशी संबंधीत असेल त्या पोलीस घटक कार्यालय प्रमुखाने बांधकामाची पूर्तता करण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबंधित अधिकाऱ्याकडे सातत्याने पाठपुरावा करावा. बांधकामाच्या अंदाजपत्रक व नकाशास विहित पध्दतीने सक्षम प्राधिकाऱ्याकडून प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्यानंतरच बांधकामावर प्रत्यक्षात खर्च करण्यात यावा.

९. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र.५, दिनांक ६.२.२००२ अन्वये केंद्र सहाय्यित बाह्य सहाय्यीत योजनांतर्गत खरेदीला १५ फेब्रुवारीनंतरच्या खरेदीबाबतचे निर्बंध लागू केलेले नाहीत. त्यानुसार केंद्र पुरस्कृत पोलीस दलाच्या आधुनिकीकरणाच्या प्रस्तुत कार्यक्रमाला १५ फेब्रुवारी नंतरच्या खरेदीबाबतचे निर्बंध लागू असणार नाहीत.

१० प्रधान सचिव, (वित्त), वित्त विभाग यांच्या अर्धशासकीय पत्र क्र.संकीर्ण-१०.०२/प्र.क्र.२७/अर्थोपाय, दिनांक ५.६.२००२ अनुसार पोलीस दलाच्या आधुनिकीकरणाच्या प्रस्तुत कार्यक्रमांतर्गत रु.५० लक्ष अथवा त्यापेक्षा अधिक रकमेचा निधी मुक्त करण्यासाठी वित्त विभागाच्या अर्थोपाय कार्यासनाची मंजूरी घेण्याची आवश्यकता असणार नाही.

११. गृह विभाग, शासन निर्णय क्रमांकःबीजीटी-१००२/प्र.क्र.१००/बीयुडी-१, दिनांक ८.१०.२००२ अन्वये चालू सन २००२-२००३ करीता वित्त विभागाने त्यांच्या उक्त दिनांक ५.६.२००२ च्या पत्रान्वये घातलेल्या सर्व निर्बंधामधून एक विशेष बाब म्हणून सुट देण्यात आलेली असून "२०५५-पोलीस" या मुख्य लेखाशिर्षाखालील अर्थसंकल्पीय तरतुद १००% उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने पोलीस दलाच्या आधुनिकीकरणाचा कार्यक्रम प्रभाविपणे राबविण्यात यावा.

१२. चालू सन २००२-२००३ च्या अर्थसंकल्पात पोलीस दलाच्या आधुनिकीकरणाची योजना राबविण्याकरिता गृह विभाग मागणी क्र.बी.१, लेखाशिर्ष "२०५५-पोलीस, ११५-पोलीस दलाचे आधुनिकीकरण, (००) (०२) जिल्हा पोलीस, (२०५५०३४६), ३२-यंत्रसामुग्री व साधनसामुग्री" खाली एकुण रु.३१६.६३ कोटी इतक्या निधीची तरतुद करण्यात आलेली आहे. सदर तरतुदीपैकी रु.५२४६.८२८ लक्ष इतका निधी पुनर्विनियोजनाद्वारे त्याच लेखा शीर्षाखालील "११५ पोलीस दलाचे आधुनिकीकरण (००) (०१) शहर पोलीस (२०५५०३०१)-३२ यंत्रसामुग्री व साधनसामुग्री" या दुय्यम/गौण/तपशीलवार शीर्षाखाली उपलब्ध करुन देण्यास

शासन मंजूरी देण्यात येत आहे. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांनी उक्त पोलीस दलाच्या आधुनिकीकरणाचा रु.५२४६.८२८ लक्ष रक्कमेचा कार्यक्रम राबविण्यासाठी येणारा खर्च पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या सदर तरतुदीतून भागवावा.

१३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाचा अनौ.संदर्भ क्र.सीआर- १०३१ /व्यय-७/२००२, दिनांक ११.१२.२००२ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(रा.बा.घाडगे)

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, वरळी, मुंबई.

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग,महाराष्ट्र राज्य, मुंबई.

सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

सचिव, (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र मुंबई/नागपूर.

महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र मुंबई/नागपूर.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

वित्त विभाग (व्यय-७/अर्थसंकल्प-१०/अर्थोपाय /(कोषा-प्र-५), मंत्रालय, मुंबई.

गृह विभाग (बीयुडी-१/पोल-७/पोल-३/पोल-५अ), मंत्रालय, मुंबई.

निवड नस्ती/पोल-४

एच-1017(बी)(500-1-03)3

**Commissioner of Police. Mumbai**

**(I) MOBILITY**

**Enclosure to H.D.G.R. No. PLF-0702/68/POL-4**

**Dated 1[illegible]th Januarv. 2003**

( Rs. in Lakhs)

| Sr.No. | Item | Amount |
|---|---|---|
| | (1) B.R. Car for protection (4) | 68.00 |
| | (2) SMALL PETROL 5 SEATER VEHICLES (123) | 571.95 |
| | (3) Light van for Police Stations (12) | 66.00 |
| | (4) 6 seater petrol small van for wireless section (6) | 14.88 |
| | (5) Motor cycle for traffic (115) | 57.50 |
| | (6) Prison vans for armed police (12) | 85.20 |
| | (7) Small diesel 9 seater vehicle for traffic (23) | 108.10 |
| | (8) Troop carrier for armed police (17) | 107.95 |
| | (9) Water tanker for armed police (3) | 16.50 |
| | (10) Canteen Van for armed police (10) | 5.70 |
| | (11) Hearse (7) | 38.50 |
| | (12) Inflatable boats (2) | 30.00 |
| | (13) Small diesel 9 seater Station Wagon for crime branch (22) | 103.40 |
| | Total **Original Demand** | 1273.68 |
| | Amount sanctioned by Govt. of India | 764.208 |

+-

# Commissioner of Police, Mumbai
## (II) COMMUNICATION

( Rs. in Lakhs)

| Sr.No. | Item | Amount |
|---|---|---|
| I | Power Supply Unit | 29.40 |
| II | Co-axial cable | 3.00 |
| III | VHF w/set | 45.00 |
| IV | Co-analyazer | 39.00 |
| V | Portable programmer | 6.00 |
| VI | Thru line walt meter (2 Nos) | 0.70 |
| VII | Hakko work station | 8.75 |
| VIII | 12 V 8 AHC battery (100) | 3.00 |
| | Total | 134.85 |

## Commissioner of Police. Mumbai

### (III) COMPUTERISATION

khs)

| Sr.No. | Item | Amount |
|---|---|---|
| I | Computers | 19.69 |
| II | Servers | 110.04 |
| III | Peripherals | 76.86 |
| IV | Softwares | 172.04 |
| V | Connectivity | 54.23 |
| VI | Furniture and consumables | 63.69 |
| VII | Training | 3.75 |
| | **Total** | 500.30 |

## Commissioner of Police, Mumbai

## (IV) WEAPONERY

(Rs. In Lakhs)

| Sr.No. | Iterm | Amount |
|---|---|---|
| I | For Armed Police and Police Stations<br>7.62 SLRs (800) | 184.00 |
| II | 9 mm carbine (200) | 22.30 |
| III | Fire extinguishers (350) @ Rs.4000 | 14.00 |
| IV | PC lathis (8000) @ Rs.285 | 22.80 |
| V | PC shield (2000) @ Rs.1716 | 34.32 |
| | **Total** | **277.42** |

**Commissioner of Police, Mumbai**

**(V) EQIPMENT**

( Rs. in Lakhs)

| SR.No. | Item | Amount |
|---|---|---|
| (I) | Binocular day purpose (20) for Spl. branch | 2.70 |
| (II) | Night vision device for spl branch (17) | 27.88 |
| (III) | Paper shredding for Police Stations (48) | 2.49 |
| (IV) | Search light for police stations (200) | 8.20 |
| (V) | Steel rack (70) | 14.00 |
| (VI) | Blood typing kit for crime branch (15) | 1.50 |
| (VII) | Miniature camera for crime branch (12) | 9.00 |
| (VIII) | Oxygen concentrator for traffic branch (30) | 18.30 |
| (IX) | Copier for police stations (11) | 8.91 |
| (X) | Digital camera for police stations (56) | 14.00 |
| (XI) | Wheel clamp truck & two wheeler (500 / 500) | 4.00/2.75 |
| (XII) | Multi-purpose belt (2500) | 30.00 |
| (XIII) | Day / night solar base flasher for pedestrain crossings (50) | 25.00 |
| (XIV) | Bollards (1000) | 9.00 |
| (XV) | Colour copiers for crime / spl branch (2) | 5.00 |
| (XVI) | Helmets (2000) | 20.00 |
| (XVII) | Spray paintaing machine with colours | 7.31 |
| (XVIII) | Portable chowkie for police stations (15) | 22.50 |
| (XIX) | BDDS equipment i.e. dynamo, drilling machine, telescope, eye protection goggles, manipoulator, hand gloves, extension mirror with torch, trolley, letter bomb detector etc. | 7.50 |
| | **Total** | **240.05** |

## Commissioner of Police , Mumbai

## (VI) BUILDING

( Rs. in Lakhs)

| Sr. No. | Item | Amount |
|---|---|---|
| (I) | Head Office - Police Station (5) @ 61.00 | 305.00 |
| (II) | Head Office - Administrative Building | 100.00 |
| (III) | Head Office - Training Centre at Kalina | 500.00 |
| (IV) | Head Office - MT Work shop at Marol | 100.00 |
| (V) | Head Office - Barracks (5) @ 15.00 | 75.00 |
| | **Total** | **1080.00** |

## Commissioner of Police, Mumbai
## (VII) POLICE HOUSING

( Rs.in Lakhs)

| | | |
|---|---|---|
| | | |
| | Head Office - constabulary (440) @ 5.11 | 2250.00 |
| | **Total** | **2250.00** |